नगर परिषद मुख्याधिकाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजनेच्या अंमलबजावणीची कार्यपध्दती.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग,

शासन निर्णय क्रमांक - एमसीओ १२१०/१२३२/प्र.क्र. १२८/१०/नवि १४

मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दिनांकः- ०५ जुलै, २०११.

वाचा:- १) शासन निर्णय,वित्त विभाग,क्र.अंनियो-१००५/१२६/सेवा-४, दि.३१ ऑक्टोबर,२००५.

२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००६/८७/सेवा-४, दि. १२ जानेवारी, २००७.

३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००७/१८/सेवा-४,दि. ७ जुलै,२००७.

४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००७/१८/सेवा-४,दि. ३ डिसेंबर,२००७.

५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००८/१५/सेवा-४,दि. ७ फेब्रुवारी,२००८.

६) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००८/१५/सेवा-४, दि. २६ फेब्रुवारी,२००८.

७) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००८/९३/सेवा-४,दि. १ डिसेंबर २००८.

## प्रस्तावना :-

शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.अंनियो-१००५/१२६/सेवा-४, दिनांक ३१ ऑक्टोबर, २००५ अन्वये राज्य शासनाने १ नोव्हेंबर,२००५ रोजी किंवा त्यानंतर राज्यशासनाच्या सेवेत नियुक्त होणा-या अधिकारी /कर्मचा-यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना अंमलात आणली आहे. त्यास अनुसरुन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेसाठी शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक-अंनियो-१००७/१८/सेवा-४, दिनांक ७ जुलै, २००७ अन्वये अंमलबजावणीची कार्यपध्दती विहित केलेली आहे. तथापि, नगर विकास विभागाकडील मुख्याधिकारी हे बव्हंशी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांवर कार्यरत असतात, त्यामुळे त्यांचे

वेतन हे शासकीय कोषागारामार्फत होत नाही. त्यांचे सेवानिवृत्ती वेतनाचे अंशदानही स्थानिक स्वराज्य संस्थेमार्फत भरले जाते, त्यामुळे मुख्याधिकाऱ्यांकरीता सदर योजनेची अंमलबजावणी करण्याची कार्यपद्धती विहीत करणे आवश्यक असल्याने नगरपरिषद मुख्याधिकाऱ्यांसाठी एक सर्वंकष कार्यपध्दती विषद करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :

०१. राज्य शासनाच्या सेवेतील जे नगरपरिषद मुख्याधिकारी दिनांक १ नोव्हेंबर, २००५ रोजी किंवा त्यानंतर नियुक्त झालेले आहेत त्यांच्यासाठी राज्य अभिलेख देखभाल अभिकरण म्हणून वित्त विभागाच्या दि. ७/७/२००७ च्या निर्णयात नमुद केलेले राज्य अभिलेख देखभाल अभिकरण काम पहातील.

आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी म्हणून नगरपरिषद मुख्याधिकारी यांच्याबाबत परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेसंबंधीचे लेखे व इतर संबंधित अभिलेख यांची देखभाल करतील. तसेच आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचलनालय या कार्यालयातील लेखा अधिकारी हे या योजनेचे अंमलबजावणी अधिकारी म्हणून राहतील.

०२. नगर विकास विभागाच्या अधिपत्याखालील जिल्हा स्तरावरील संबंधित जिल्हा प्रकल्प अधिकारी (नगर विकास शाखा), हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून राहतील.

## योजना अंमलात आणावयाची कार्यपध्दती

०३. जिल्हाधिकारी कार्यालयातील जिल्हा प्रकल्प अधिकारी (नगर विकास शाखा) तसेच नगरपरिषदेचे संबंधित आहरण व संवितरण अधिकारी म्हणजेच मुख्याधिकारी आणि कोषागार अधिकारी यांनी खाली विहीत केलेल्या कार्यपध्दतीचे काटेकोरपणे पालन करावे.

### अ) मुख्याधिकाऱ्यांकडून माहिती प्राप्त करुन लेखा क्रमांक देणेबाबत...

१) जिल्हा प्रकल्प अधिकारी संबधित जिल्ह्यातील नगरपालिकांचे मुख्याधिकारी आणि महानगरपालिकेत आयुक्त/ सहायक आयुक्त किंवा इतर पदावर कार्यरत मुख्याधिकारी संवर्गातील अधिकारी यांचेकडून माहिती प्राप्त करुन त्यांना लेखा क्रमांक प्राप्त करुन देतील.

२) जे मुख्याधिकारी प्रादेशिक संचालक कार्यालयात कार्यरत आहेत, तथापि ज्याच्यासाठी अद्याप लेखा क्रमांक घेण्यात आलेला नाही, त्यांनीसुध्द्रा त्या जिल्ह्याच्या जिल्हा प्रकल्प अधिकाऱ्यामार्फत लेखा क्रमांक प्राप्त करण्याचा अर्ज संबधित कोषागाराकडे पाठवावा. ज्यांनी यापूर्वीच लेखाक्रमांक घेतला असेल त्यांनी त्याची माहिती संबधित जिल्ह्याच्या जिल्हा प्रकल्प अधिकारी तसेच नगरपरिषद प्रशासन संचालनालयास पाठवावी.

३) जिल्हा प्रकल्प अधिकारी हे स्वत: आहरण व वितरण अधिकारी असल्याने त्यांचेबाबत विहित नमुना १ मधील लेखा क्रमांक मिळविण्याचा अर्ज ते स्वत: साक्षांकित करतील.

४) नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी येथील लेखाधिकारी यांचेकडे नविन परिभाषीत अंशदान निवृत्ती वेतन योजनेंतर्गत असलेल्या मुख्याधिकाऱ्यांचे लेखा क्रमांकाची माहिती एकत्रितरित्या असणे आवश्यक आहे. त्यासाठी त्यांनी जिल्हा प्रकल्प अधिकारी यांचेकडून संबधित मुख्याधिकाऱ्याचे लेखा क्रमांक प्राप्त करुन जतन करावेत.

ब) **अंशदानाची वसुली :**

१) जिल्हा प्रकल्प अधिकाऱ्यांनी त्यांच्याकडे नगरपरिषदेकडे आणि महानगरपालिकेकडे कार्यरत असणाऱ्या मुख्याधिकाऱ्यांच्या जमा होणाऱ्या एकुण रक्कमेचे (संबधित कर्मचाऱ्याचे अंशदान व नियोक्त्याचे अशंदान) चलन तयार करुन सदर रक्कम नेमुन दिलेल्या शिर्षाखाली बँकेत भरुन बँकेच्या शिक्क्याची चलनाची प्रत अनुसुचिच्या एका प्रतीसह संबधित कोषागाराकडे वेतनाच्या महिन्याच्या पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत कोणत्याही परिस्थितीत पाठवावी.

२) जे मुख्याधिकारी जिल्हा प्रकल्प अधिकारी म्हणून कार्यरत असतील तसेच जे मुख्याधिकारी प्रादेशिक कार्यालयात कार्यरत असतील व ज्यांची देयके कोषागारावर सादर होतील, (शासन अधिपत्याखालील कार्यालये) त्यांच्या आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी देयकासोबतच्या अनुसुचित तसेच देयकात केवळ संबधित मुख्याधिकाऱ्याचे अंशदान नमुद करावे. नियोक्त्याचे अशंदान राज्य अभिलेख देखभाल अभिकरण यांनी नियमित कार्यपद्धतीने अशा अधिकाऱ्याच्या खाती जमा करावे.

३) नगरपरिषदेवर आणि महानगरपालिकेत कार्यरत मुख्याधिकाऱ्यांचे वेतन देयक तयार करताना संबधित अधिकाऱ्याने मुख्याधिकाऱ्यांच्या वेतन देयकातून त्यांच्या अंशदानाची तसेच नियोक्त्याच्या सममूल्य अंशदानाची रक्कम वसुल करावी.

०४. प्रतिनियुक्तीवर कार्यरत असणाऱ्या मुख्याधिकाऱ्यांच्या अंशदानाच्या बाबतीत वित्त विभाग क्र. अंनियो-१००७/१८/सेवा-४, दि. ०७ जुलै, २००७ च्या शासन आदेशात दिलेल्या निर्देशानुसार कार्यवाही करण्यात येईल.

०५. मुख्याधिकाऱ्याकडून वसुल करण्यात आलेल्या अंशदानाची रक्कम जमा करण्याचे लेखाशिर्ष खालीलप्रमाणे असेल.

| | | |
|---|---|---|
| ८३४२ | - | इतर ठेवी, |
| ११७ | - | शासकीय कर्मचाऱ्यांसाठी परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना |
| (०२) (०१) | - | परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना- शासकीय कर्मचाऱ्याचे अंशदान - स्तर - १ (८३४२-५०८-१) |
| ३२ | - | अंशदाने |

नियोक्त्याच्या रक्कमेसोबत सममुल्य अंशदानाची रक्कम जमा करण्याचे लेखाशिर्ष पुढीलप्रमाणे असेल.

| | | |
|---|---|---|
| ८३४२ | - | इतर ठेवी, |
| ११७ | - | शासकीय कर्मचाऱ्याकरीता परिभाषित अंशदान निवृत्ती वेतन योजना |
| (०१) (०१) | - | परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजना. नियोक्त्याचे अंशदान - स्तर १ - (८३४२-५०९-९) |
| ३२ | - | अंशदाने |

०६. वरील कार्यपद्धती व्यतिरीक्त इतर सर्व बाबी वित्त विभागाच्या शासन निर्णय दि. ०७ जुलै, २००७ मध्ये विषद केल्याप्रमाणे राहतील.

०७. नवीन परिभाषित अंशदान निवृत्तीवेतन योजनेसंबंधी वित्त विभागाचे वेळोवेळचे निर्गमित होणारे शासन निर्णय मुख्याधिकाऱ्यांना लागू राहतील.

०८. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-.अनौ.संदर्भ क्र.४९/११ सेवा-४ दि.०४/०३/२०११ अन्वये त्या विभागाने दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

०९. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०११०७०६१६२७१७००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

(कैलास गायकवाड)
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन.**

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर. (५ प्रती ),
महालेखापाल ( लेखापरीक्षा)-१/२, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर (५ प्रती),
आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई ४०० ०३०.
सर्व विभागीय आयुक्त (प्रत्येकी ५ प्रती)
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.(५ प्रती)
संचालक, राज्य देखभाल अभिकरण, मुंबई.
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
सर्व जिल्हाधिकारी
सर्व जिल्हा प्रकल्प अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय (प्रत्येकी १५ प्रती)
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय
वित्त विभाग (कार्यासन सेवा-४/कोषा-५ ) मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती कार्यासन क्र.नवि १४